केंद्र पुरस्कृत कृषी उन्नती योजनेंतर्गत कृषी यांत्रिकीकरण उप अभियान सन २०१५-१६ मध्ये राज्यात राबविण्यासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः कृयांउ-१०१५/ प्र.क्र.१०५/४अे**

मादाम कामा मार्ग, हुमात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०० ०३२

तारीख: १० जुलै, २०१५

**वाचा**

१) शासन निर्णय क्रमांकः कृयांउ-१०१४/प्र.क्र.१२४/४-अे, दिनांक ०३ जून, २०१४

२) कार्यकारी समितीच्या दि. १६ एप्रिल, २०१५ रोजीच्या बैठकीचे ईतीवृत्त क्र.३-४/२०१४ M&T (I&P), दि. २० एप्रिल, २०१५

३) केंद्र शासनाचे अवर सचिव यांचे पत्र क्र. ५-१/२०१५-M&T (Admin), दि. २२ मे, २०१५

४) केंद्र शासनाने उपअभियानासंदर्भात http://farmtech.gov.in या सांकेतस्थळावर उपलब्ध करून दिलेल्या मार्गदर्शक सूचना

**प्रस्तावना**

केंद्र शासनाने बाराव्या पंचवार्षिक योजनेमध्ये सन २०१४-१५ पासून कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियान राबविण्याचे निश्चित केले आहे. सदर अभियानांतर्गत कृषि यांत्रिकीकरण उपअभियानाचा अंतर्भाव केला आहे. सन २०१५-१६ पासून सदर उप अभियान कृषी उन्नती योजनेअंतर्गत राबविण्याचे केंद्र शासनाने निश्चित केले आहे. सदर उपअभियानांतर्गत एकूण आठ घटक असून, घटक क्रमांक १ व २ हे नवीन तंत्रज्ञानाने विकसित केलेल्या संयंत्राची प्रात्यक्षिके, प्रशिक्षण व चाचणी बाबत आहेत. सन २०१४-१५ पर्यंत, हे दोन्ही घटक १००% केंद्र पुरस्कृत व उर्वरीत ६ घटकासाठी केंद्र व राज्य शासनाच्या निधीच्या हिश्याचे प्रमाण ७५:२५ टक्के असे होते. केंद्र शासनाने सन २०१५-१६ पासून घटक क्र. १ व २ यासाठी केंद्र हिश्श्याचे १०० टक्के अनुदानाचे प्रमाण कायम ठेवले असून, उर्वरीत ६ घटकासाठी केंद्र व राज्य शासनाच्या निधीच्या हिश्याचे प्रमाण ५०:५० असे केले आहे. केंद्र शासनाने सदर उपअभियानाच्या मार्गदर्शक सूचना http://farmtech.gov.in या सांकेतस्थळावर उपलब्ध करून दिलेल्या आहेत. सदर उपअभियान राज्यात राबविण्यासाठी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार संदर्भाधीन अ.क्र.१ येथील दि. ०३ जून, २०१४ च्या शासन निर्णयान्वये विविध समित्यांची स्थापना

करण्यात आली आहे. केंद्र शासनाने सदर उपअभियान, राज्यात सन २०१५-१६ मध्ये राबविण्यासाठी संदर्भाधीन अ.क्र.२ येथील इतिवृत्तानुसार ₹ ३१९२.०३ लाख एवढा नियतव्यय मंजूर केले असल्याचे कळविले आहे. यामध्ये केंद्र हिस्सा ₹ १५९६.०२ लाख व राज्य हिस्सा ₹१५९६.०१ लाख एवढा आहे. सदर ₹ ३१९२.०३ लाख (अक्षरी रूपये एकतीस कोटी, ब्याण्णव लाख व तीन हजार फक्त) निधीच्या कार्यक्रम राज्यात राबविण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

१) कृषी उन्नती योजनेअंतर्गत कृषि यांत्रिकीकरण उपअभियान राज्यात सन २०१५-१६ मध्ये राबविण्यासाठी केंद्र हिश्श्यापोटी मंजूर करण्यात आलेला ₹ १५९६.०२ लाख व त्यानुषंगाने राज्य हिश्श्याचा ₹ १५९६.०१ लाख, अशा एकूण ₹ ३१९२.०३ लाख ( अक्षरी रूपये एकतीस कोटी, ब्याण्णव लाख व तीन हजार फक्त ) निधीच्या कार्यक्रमास शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२) सदर कार्यक्रम केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन दि. २० एप्रिल, २०१५ च्या इतिवृत्तान्वये मंजूर केलेल्या नियतव्ययाच्या मर्यादेत राबविण्यात यावा.

३) सदर कार्यक्रम राबविताना उपअभियानाच्या संदर्भाधीन अ.क्र. ४ येथील मार्गदर्शक सूचनांचे, संदर्भाधीन अ.क्र.२ अन्वये वितरित केलेल्या कार्यकारी समितीच्या बैठकीच्या कार्यवृत्तातील परिच्छेद ५ येथील सुधारणांसह, तसेच संदर्भाधीन अ.क्र.३ येथील केंद्र शासनाच्या दि. २२ मे, २०१५ च्या पत्रातील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

४) केंद्र शासनाच्या मंजूर आर्थिक मर्यादेतच कार्यक्रम राबविण्याची आवश्यक ती दक्षता कृषि संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घ्यावी.

५) सदर उपअभियान सन २०१५-१६ या वर्षामध्ये राबविण्यासाठी ₹ ३१९२.०३ लाख खर्चाच्या कार्यक्रमासाठी कृषि संचालक ( निविष्ठा व गुणनियंत्रण ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी व आयुक्तालय स्तरावर सह संचालक (लेखा-१) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे व या निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यास त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. त्याचप्रमाणे सदर प्रयोजनासाठी विभाग स्तरावर विभागीय कृषी सह संचालक कार्यालयातील लेखाधिकारी, जिल्हास्तरावर जिल्हा अधिक्षक कृषी कार्यालयातील लेखाधिकारी व तालुका स्तरावर तालुका कृषी अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. या योजनेचा खर्च मासिक निधी

विवरणपत्राच्या मर्यादेत होईल, याची दक्षता कृषि संचालक ( निविष्ठा व गुणनियंत्रण ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घ्यावी.

६) सदर निधी खर्च करताना तो विहित कार्यपध्दती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे /पक्रियेचे /वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत/ P.W.D. मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार/CAG च्या निर्देशानुसार /प्रचलित शासन निर्णय /नियम/परिपत्रक/तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

७) कृषी यांत्रिकीकरण उपअभियानाच्या उद्दिष्ट पूर्तीसाठी संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून उद्दिष्टनिहाय सविस्तर मार्गदर्शक सूचना सर्व क्षेत्रीय अधिका-यांस निर्गमित कराव्यात. या मार्गदर्शक सूचना निर्गमित करतेवेळी पुढील प्रमुख बाबी अंतर्भूत करण्याची दक्षता घेण्यात यावी

I) लाभार्थी निवडताना लहान व सिमांतक शेतकरी, अनुसूचित जाती/जमाती शेतकरी व महिला लाभार्थी यांना प्राधान्य देण्यात यावे.

II) अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती लाभार्थ्यांसाठी मंजूर असलेला खर्च त्याच प्रवर्गासाठी करण्यात यावा व याबाबतच्या नोंदी स्वतंत्रपणे ठेवण्यात याव्यात. तथापि, अनुसूचित जाती/ अनुसूचित जमाती यांच्यासाठी निधीचे वाटप करताना त्या- त्या जिल्ह्यात त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात करण्यात यावे.

III) उपअभियानाची अमंलबजावणी अधिक प्रभावीपणे व परिणामकारकरित्या होण्याच्या दृष्टीने या उपअभियानाअंतर्गत प्रकल्पाधारित विकास / विस्तार कार्यक्रम राबविण्यात यावा..

IV) या उपअभियानाचे मुल्यमापन त्रयस्थ यंत्रणेकडून करून घ्यावे.

८) केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगतीचा मासिक अहवाल प्रत्येक महिन्याला ५ तारखेपर्यंत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल, व सदर अहवाल केद्र शासनास सादर करताना त्यामध्ये महिला शेतकरी, अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती शेतकरी यांच्यासाठी निर्धारित केलेले भौतिक/आर्थिक लक्षांक व साध्य याबाबतची माहिती वेगळ्याने सादर होईल, याबाबत दक्षता घेण्यात यावी.

९) सदर शासन निर्णय अपर मुख्य सचिव (कृषी ) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१०१७१५२८२५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth Hoktuji Chawre

Digitally signed by Siddharth Hoktuji Chawre
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agricultural and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Siddharth Hoktuji Chawre
Date: 2015.07.10 17:16:55 +05'30'

**( सिध्दार्थ चवरे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
२. कुलगुरू, कृषी विद्यापीठे (सर्व )
३. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,पुणे (१० प्रती)
४. जिल्हाधिकारी (सर्व)
५. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
७. सर्व संचालक/ सहसंचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
८. व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ दिनकरराव देसाई मार्ग, गोरेगाव (पूर्व ) मुंबई- ६५
९. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
१०.जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
११.सर्व मुख्य वित्त व लेखाधिकारी (जिल्हापरिषद)
१२.सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद
१३.महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबईनागपूर/ (लेखा परिक्षा( /(लेखा व अनुज्ञेयता)
१४. महालेखाकार (स्थानिय) निकाय लेखापरिक्षा व लेखा प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०००२०
१५.सर्व कोषागार अधिकारी
१६.व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँक, मुंबई

१७.व्यवस्थापकीय संचालक,भूविकास बँक , मुंबई

१८. अध्यक्ष सर्व जिल्हा परिषदा

१९.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.

२०.नियोजन विभाग (का-१४३१) /मंत्रालय, मुंबई-३२

२१.वित्त विभाग ( व्यय-१ व अर्थसंकल्प - १३ ) / मंत्रालय, मुंबई-३२

२२.ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

२३.मा. राज्यमंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव

२४.मा. मंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव

२५.निवड नस्ती (कार्यासन -४अे)